सहसंचालक, आरोग्य सेवा (हि.ह.व ज.ज.रोग), पुणे यांचे अधिपत्याखालील कार्यक्रमाच्या आढाव्यानुसार प्रशासकीय कामकाजात सुधारणा करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः संकीर्ण २०१९/प्र.क्र.२८७/सेवा-५**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,
मंत्रालय, मुंबई-४००००१
तारीख: २२ नोव्हेंबर,२०१९

**प्रस्तावना :**

राष्ट्रीय किटकजन्य नियंत्रण कार्यक्रमांतर्गत करण्यात येणारे कामकाज उपलब्ध मनुष्यबळ या कार्यक्रमांतर्गत घेण्यात येणारे हंगामी मनुष्यबळ, मंजुर मनुष्य दिवस, त्यांचे कामाचे स्वरुप केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचना जिल्हा निहाय ए.पी.आय. इंडेक्स व अनुषंगीक न्यायालयीन प्रकरणे याचा तपशीलवार सर्वंकष आढावा घेण्यात आला. आढावाअंती या कार्यक्रमांतर्गत होणाऱ्या कामाकाजामध्ये प्रशासकीय कामकाज करताना जिल्हा हिवताप अधिकारी किंवा संबंधित क्षेत्रिय कार्यालयाकडून निष्काळजीपणा व गैरप्रकार होत असल्याचे निदर्शनास आल्याने या कार्यक्रमांतर्गत सुसुत्रता व प्रशासकीय सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. यास्तव घेण्यात आलेले निर्णय व सुधारणा या परिपत्रकानुसार अंमलात आणण्यात याव्यात.

## -: शासन परिपत्रक :-

१. राष्ट्रीय हिवताप निर्मुलन कार्यक्रमांतर्गत ज्या पदांचे नियुक्ती प्राधिकारी, जिल्हा हिवताप अधिकारी होते त्या ऐवजी आता या पदांचे नियुक्ती प्राधिकारी हे संबंधित उपसंचालक, आरोग्य सेवा परिमंडळ हे राहतील. सदर बदल अधिसुचित करण्याची प्रक्रिया शासनस्तरावर सुरु करण्यात येत आहे.
२. जिल्हयातील हिवताप, हत्तीरोग व साथरोग नियंत्रण कार्यक्रमाचे तसेच प्रशासकीय कामकाजाचे जिल्हासंबंधित संनियत्रण पुढील आदेशापर्यत जिल्हा आरोग्य आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद यांचेकडे सोपविण्यात येत आहे. सबंधित जिल्हा हिवताप अधिकारी यांनी जिल्हा आरोग्य अधिकारी यांचे मार्गदर्शनाखाली कामकाज पहावे.
३. जिल्हा हिवताप अधिकारी यांचे वेतन जिल्हा आरोग्य अधिकारी, यांचे स्तरावरुन अहारित करण्यात यावे.
४. प्राथमिक आरोग्य केंद्राअंतर्गत नियुक्त हिवताप, हत्तीरोग कार्यक्रमांतर्गत बहुउद्देशिय आरोग्य कर्मचारी, आरोग्य सहायक आणि प्रयोगशाळा तंत्रज्ञ यांचे वेतन व भत्ते संबंधित वैद्यकीय अधिकारी प्राथमिक आरोग्य केंद्र यांनी आहरीत करावे. सदर वेतनाचे आहरण या पुर्वी ज्या लेखाशिर्षातून जिल्हा हिवताप अधिकारी यांचेमार्फत करण्यात येत होते त्याच लेखाशिर्षामधून संबंधित वैद्यकीय

अधिकारी यांनी लेखा शिर्षाचे आहरण व वितरण करावे. व त्यासाठी संबंधित वैद्यकीय अधिकारी प्राथमिक आरोग्य केंद्र यांना आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्यात येत आहे.

५. महानगर वगळता शहरी भागात नियुक्त बहुउद्देशिय आरोग्य कर्मचारी, आरोग्य सहायक आणि प्रयोगशाळा तंत्रज्ञ, पर्यवेक्षकीय स्तरावरील कर्मचारी यांचे वेतन यापुर्वी ज्या लेखाशिर्षामधून आहरीत करण्यात येत होते त्याच लेखाशिर्षामधून आता तालुका आरोग्य अधिकाऱ्यांनी वेतन आहरीत करावे.

६. हंगामी फवारणी कर्मचाऱ्यांच्या सेवाजेष्ठता याद्या तात्काळ अंतिम करण्यात याव्यात. हंगामी फवारणी कर्मचाऱ्यांना दिलेली नियुक्ती, मंजुर मनुष्यदिवस व संबंधित कर्मचाऱ्यांला अदा केलेल्या दिवसांचे मानधन परिगणीत करुन त्यानुसारच सेवाजेष्ठता याद्या अंतिम करण्यात याव्यात.

७. राष्ट्रीय हिवताप कार्यक्रमांतर्गत फवारणीसाठी मनुष्यदिवस मंजुर नसतानाही लावण्यात आलेले हंगामी मनुष्यबळ कोणत्याही प्रयोजनार्थ वैध ठरविण्यात येणार नाही, अशा परिस्थितीत मनुष्यबळ मंजूर नसताना देण्यात आलेली प्रमाणपत्रे अवैध प्रमाणपत्रे गणण्यात येऊन अशी सर्व प्रमाणपत्रे तपासून रद्द करण्याची कार्यवाही तात्काळ करण्यात यावी.

८. हंगामी मनुष्य बळाने केलेले कामकाज, त्यासाठी मंजुर असलेले मनुष्यबळ व त्यानुसार हजेरीपत्रक प्रमाणित करण्यात यावेत व विहीत नमुन्यात प्रमाणपत्र देण्यात यावेत. कोणत्याही परिस्थितीत मनुष्यदिवस व मनुष्यबळ यांची सुत्रानुसार सांगड घालून तेवढ्याच हंगामी फवारणी कर्मचाऱ्यांना काम उपलब्ध करुन द्यावे. अन्यथा सदर अनियमिततेस सर्व सबंधितांना जबाबदार धरुन त्यांचेवर तात्काळ फसवणूक व शिस्तभंगविषयक कार्यवाही या अनुषंगाने पुढील कार्यवाही करण्यात येईल.

९. हंगामी फवारणी कर्मचाऱ्यांची सेवाजेष्ठता उपरोक्त नुसार प्रमाणित केल्यानंतर याबाबतची सर्व माहिती आरोग्य सेवा संचालनालयाने राज्यस्तरावरुन उपलब्ध करुन दिलेल्या संगणक प्रणालीत भरावी व चक्राकार पध्दतीने हंगामी फवारणी कर्मचाऱ्यांना सेवाजेष्ठतेनुसार काम उपलब्ध करुन द्यावे. कोणत्याही साथरोग परिस्थितीत देखील एकाच हंगामी कर्मचाऱ्याला एका कॅलेंडर वर्षात एकूण १७९ दिवसांपेक्षा जास्त दिवसांचे काम देण्यात येऊ नये.

१०.हिवताप कार्यक्रमांतर्गत कार्यरत असलेल्या प्रयोगशाळा तंत्रज्ञाकडून केवळ हिवतापाच्याच अनुषंगाने रक्त तपासणी करण्यात येते असे न करता या कर्मचाऱ्यांच्या सेवा बहुउद्देशिय दृष्टीने वापरण्यासाठी शासकीय रुग्णालयातील नियमित रक्त चाचण्या, लघवी, थुंकी व इतर तपासणीसाठीही वापरण्यात याव्यात व जे कर्मचारी या कामासाठी पुर्णत: प्रशिक्षित नसतील त्यांना या तपासण्यांचे प्रशिक्षण जिल्हा रुग्णालयात देण्यात यावे.

११. बहुउद्देशिय कर्मचारी यांच्या सेवा केवळ हिवताप कार्यक्रमापुरताच मर्यादित न राहता त्यांना इतर साथरोग / संसंर्गजन्य रोग/ असंसर्गजन्य रोग/ कुटुंब कल्याण कार्यक्रम इ. आरोग्य विषयक कार्यक्रमांसाठी त्यांच्या सेवा उपलब्ध करुन देण्यात याव्यात व त्यांना नेमूण देण्यात आलेली कामे करणे बंधनकारक राहील.

१२.राज्यातून प्लेगचे समुळ उच्चाटन झाले आहे यास्तव प्लेग निर्मुलन पथकात मंजुर व कार्यरत पदाचे समकक्ष पदावर समावेशन करण्याबाबतचा प्रस्ताव तात्काळ सादर करावा.

१३.न्यायालयीन प्रकरणे हाताळण्याबाबत मा.मुख्यसचिव स्तरावर झालेल्या बैठकीनुसार मार्गदर्शक

सुचना निर्गमित झालेल्या आहेत. न्यायालयीन प्रकरणे हाताळण्यासाठी तसेच न्यायालयातयात सुनावणीच्या तारखांना उपस्थित राहण्यासाठी जबाबदार अधिकारी/ कर्मचाऱ्यांची नियुक्ती करुन त्यांना संबंधित प्रकरणी तारखांना उपस्थित राहण्याबाबत आदेशीत करावे. यामध्ये दिरंगाई करणाऱ्या व अपुर्ण माहिती सादर करणाऱ्या सर्व संबंधितावर प्रशासकीय व प्रकरणाच्या गांभिर्यानुसार आवश्यकतेनुसार फौजदारी कारवाई करावी व सर्व न्यायालयीन प्रकरणांचा नियतकालीक आढावा घेण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९११२२१६०३४७५६१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ARCHANA VILAS WALZADE

Digitally signed by ARCHANA VILAS WALZADE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=b17094004b015083dae757656e5d24847898197ddd6b0366a9177f097ed0887a, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=b4e19876ab3eec36e3a3b988441648ab87470cdfe66b14cfbe7ac9bd770485c1, ou=PUBLIC HEALTH DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=ARCHANA VILAS WALZADE
Date: 2019.11.22 17:41:12 +05'30'

(अर्चना वालझाडे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. प्रधान सचिव, ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई
२. सहसचिव/ उपसचिव/ अवर सचिव/ कक्ष अधिकारी (सर्व), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
३. आयुक्त तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
४. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
५. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, पुणे
६. सहसंचालक, आरोग्य सेवा संचालनालय, (सर्व)
७. उपसंचालक, आरोग्य सेवा संचालनालय, (सर्व परिमंडळे)
८. जिल्हा हिवताप अधिकारी, (सर्व जिल्हे)
९. वैद्यकीय अधिकारी, (सर्व)
१०.जिल्हा आरोग्य अधिकारी (सर्व)
११.महालेखापाल, महाराष्ट्र (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
१२.मुख्य प्रशासकीय अधिकारी, (सर्व)
१३.जिल्हा/उप जिल्हा/तालुका कोषागार अधिकारी, (सर्व )

१४.प्रधान सचिव,सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण विभाग, मंत्रालय,मुंबई यांचे स्वीय सहाय्यक

१५.उपसचिव(सेवा-५), यांचे स्वीय सहाय्यक

१६.निवडनस्ती (सेवा-५)